**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली २०१८/प्र.क्र. २८/१४ अ.**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०००३२
तारीख: २७ जुलै, २०१८

<u>संदर्भ</u>:- १) सामान्य प्रशासन विभागाचे समक्रमांक दिनांक ०७-०५-२०१८, दिनांक २५-०५-२०१८ व दिनांक ३१-०५-२०१८
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१४, दिनांक ०९-०८-२०१६
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/१४, दिनांक २३-१२-२०१६

**<u>शासन आदेश</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(१), ४(२) व ४(३) नुसार मंत्रालयीन लिपिक-टंकलेखकांच्या बदल्या संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ०७-०५-२०१८ अन्वये तसेच काही लिपिक-टंकलेखकांच्या पदस्थापनेत बदल संदर्भाधिन क्र. १ येथील ३१-०५-२०१८ अन्वये करण्यात आलेल्या आहेत तर बदली अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) नुसार व मा. मुख्यमंत्र्यांच्या मान्यतेने मंत्रालयीन लिपिक-टंकलेखकांच्या समक्रमांकाच्या दिनांक २५-०५-२०१८ च्या आदेशान्वये मंत्रालयीन विभागात बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या आहेत. सदर आदेशातील लिपिक-टंकलेखकांना दिनांक ३१-०५-२०१८ पर्यंत संबंधित विभागाने कार्यमुक्त करावायाचे होते. तथापि, त्यांच्या सध्याच्या विभागामधून **बदली झालेल्या विभागात रुजू होण्यासाठी अद्याप खाली नमूद लिपिक-टंकलेखकांना कार्यमुक्त करण्यात आलेले नाही**. आता संदर्भाधिन क्रमांक २ व ३ येथील शासन परिपत्रक व शासन निर्णयातील तरतूदीनुसार या आदेशान्वये त्यांना दिनांक ३१-०७-२०१८ म.नं. रोजी एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. खालील कर्मचाऱ्यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता त्यांच्या नावासमोर **रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे**. :-

| अ.क्र. | श्री/ श्रीमती | लिपिक-टंकलेखकाचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | सु.ता.सकट | गृह विभाग | विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग |
| २ | श्री | श.बा.दराडे | महसूल व वन विभाग | गृह विभाग |
| ३ | श्री | दि.ग.पवार | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | महसूल व वन विभाग |
| ४ | श्री | प्र.भ.सावंत | जलसंपदा विभाग | महसूल व वन विभाग |
| ५ | श्री | यो.चं.जाधव | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | नगर विकास विभाग |
| ६ | श्री | यो.ल.पाटील | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | नियोजन विभाग |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ | श्री | रा.अ.विचारे | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | गृह विभाग |
| ८ | श्री | गो.चं.राणे | उच्च व तंत्र शिक्षण विभाग | ग्रामविकास विभाग |
| ९ | श्री | लि.रा.गुमगावकर | महिला व बाल विकास विभाग | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| १० | श्री | नि.ल.राणे | मराठी भाषा विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२. संबंधित लिपिक-टंकलेखकांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता त्यांच्या नावासमोर **रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे.**

३. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ चे नियम १२ मधील तरतुदीनुसार उपरोक्त तक्त्यात नमूद लिपिक-टंकलेखकांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नसल्याने, ते जर त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू झाले नाहीत तर, त्यांच्या अनुपस्थितीचा कालावधी सेवाखंड धरण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२७१७५५५४६४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.07.27 17:56:23 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित लिपिक-टंकलेखक, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२. अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई - ४०० ०३२. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

३. सह / उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

४. निवडनस्ती.